**शासनमान्य सार्वजनिक ग्रंथालयांचे सन २०१९-२० मधील थकीत असलेले सहाय्यक अनुदान (अनिवार्य) वितरीत करणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक -मराग्रं-२०२०/प्र.क्र.६०/साशि-५,**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ०३ ऑगस्ट, २०२०.

<u>वाचा</u> : १) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र अर्थसं-२०२०/प्र.क्र.६४/अर्थ-३,दिनांक १६.०४.२०२०.
२) ग्रंथालय संचालक, ग्रंथालय संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र.३२/२०२०-२१/९०, दिनांक ०४.०५.२०२०.

**<u>प्रस्तावना :</u>**

राज्यातील शासनमान्य सार्वजननक ग्रंथालयांच्या सहाय्यक अनुदानासाठी सन २०२०-२१ या आर्थिक वर्षात मागणी क्र.डब्ल्यू-४, २२०५- कला व संस्कृती, १०५ सार्वजननक ग्रंथालये, (०३) (०१) मध्यवर्ती, जिल्हा व तालुका ग्रंथालयांना सहाय्य (अनिवार्य) (२२०५ ०२९८) ३१- सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर) या लेखाशिर्षातर्गत रु.१२३,७५,००,०००/- (अक्षरी रुपये एकशे तेवीस कोटी पंच्चाहत्तर लाख फ़क्त) इतका निधी अर्थसंकल्पित करण्यात आला आहे. सन २०१९-२० या आर्थिक वर्षात शासनमान्य सार्वजनिक ग्रंथालयांचे ३२,२९,००,०००/-(अक्षरी रुपये बत्तीस कोटी एकोणतीस लाख फ़क्त) देय अनुदान थकीत आहे. सदर सन २०१९-२० या आर्थिक वर्षातील थकीत अनुदान अदा करण्यासाठी सन २०२०-२१ या आर्थिक वर्षातील अर्थसंकल्पित तरतुदीमधून २५ टक्के म्हणजेच रु. ३०,९३,७५,००० ( अक्षरी रुपये तीस कोटी त्र्यान्नव लाख पंच्चाहत्तर हजार फ़क्त ) इतका निधी वितरीत करण्यास वित्त विभागाने सहमती दर्शविली आहे. यानुषंगाने सन २०१९-२० या आर्थिक वर्षातील शासनमान्य सार्वजनिक ग्रंथालयांच्या देय थकीत अनुदानासाठी रु. ३०,९३,७५,००० ( अक्षरी रुपये तीस कोटी त्र्यान्नव लाख पंच्चाहत्तर हजार फ़क्त ) इतका निधी वितरीत करुन खर्चास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय:**

राज्यातील शासनमान्य सार्वजननक ग्रंथालयांच्या सहाय्यक अनुदानासाठी सन २०२०-२१ या आर्थिक वर्षात मागणी क्र.डब्ल्यू-४, २२०५- कला व संस्कृती, १०५ सार्वजननक ग्रंथालये, (०३) (०१) मध्यवर्ती, जिल्हा व तालुका ग्रंथालयांना सहाय्य (अनिवार्य) (२२०५ ०२९८) ३१-सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर) या लेखाशिर्षातर्गत रु.१२३,७५,००,०००/- (अक्षरी रुपये एकशे तेवीस कोटी पंच्चाहत्तर लाख फ़क्त) इतका निधी अर्थसंकल्पित करण्यात आला आहे. सदर अर्थसंकल्पित तरतुदीमधून सन २०१९-२० या आर्थिक वर्षातील शासनमान्य सार्वजनिक ग्रंथालयांच्या देय थकीत अनुदानासाठी रु. ३०,९३,७५,००० ( अक्षरी रुपये तीस कोटी त्र्यान्नव लाख पंच्चाहत्तर हजार फ़क्त ) इतका निधी संबंधित जिल्हा ग्रंथालय अधिकारी कार्यालयास वितरीत व खर्च करण्यास ग्रंथालय संचालक, ग्रंथालय

संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना शासन मान्यता देण्यात येत आहे. तसेच जिल्हा ग्रंथालय अधिकारी कार्यालयाच्या कार्यालय प्रमुखांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे व त्यांना ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) या उद्दीष्टाखालील देयकावर नियंत्रक अधिकारी म्हणून प्रतिस्वाक्षरी करण्याचे अधिकार प्रदान करण्यात येत आहेत.

२. सदरचा खर्च मागणी क्र. डब्ल्यू-४, २२०५- कला व संस्कृती, १०५ सार्वजनिक ग्रंथालये, (०३)(०१) मध्यवर्ती, जिल्हा व तालुका ग्रंथालयांना सहाय्य (अनिवार्य) (२२०५ ०२९८) ३१- सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर) या लेखाशिर्षातर्गत सन २०२०-२१ मध्ये अर्थसंकल्पीत तरतूदीपैकी वितरीत केलेल्या निधीतून भागविण्यात यावा.

३. अनुदानाच्या रक्कमेची उपयोगिता प्रमाणपत्रे संबंधित कार्यालय प्रमुखांनी विहित मुदतीत सादर करणे आवश्यक राहील.

४. शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र अर्थसं-२०२०/प्र.क्र.६४/अर्थ-३,दिनांक १६.०४.२०२० मधील सूचनांचे/अटींची पुर्तता करण्यास आली असून सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ३५३/२०२०/व्यय-५, दि.३१.०७.२०२० अन्वये प्राप्त सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००८०३१५४९०३६१०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Anil Raghunath Katkar

Digitally signed by Anil Raghunath Katkar
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Higher & Technical Education Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c3fec0b0f5c05dc9058175992109e62d3f5719b9dfb87a96579dc30c265d67ce, serialNumber=2356d82c73e8a0c7b6da68b6511197206b94720842cda576febebf84581fc52a, cn=Anil Raghunath Katkar
Date: 2020.08.03 15:59:11 +05'30'

**( अ.र.काटकर )**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. महालेखापाल-१ (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई
२. महालेखापाल -२ (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), नागपूर
३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
४. निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई
५. ग्रंथालय संचालक, ग्रंथालय संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
६. कक्ष अधिकारी (साशि १), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.

७. सर्व सहाय्यक ग्रंथालय संचालक/जिल्हा ग्रंथालय अधिकारी/जिल्हा ग्रंथपाल (ग्रंथालय संचालनालयामार्फ़त)

८. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी

९. सर्व जिल्हा ग्रंथालय अधिकारी.

१०. अ.मु.स. (उ.व.तं.शि.) यांचे स्वीय सहाय्यक

११. निवडनस्ती (साशि-५), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.